वीज धोरण ठरविणे बाबत
समिती गठित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

### शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र. ५९/ऊर्जा-५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०२०.

**प्रस्तावना :-**

वीज ही अत्यावश्यक सेवा असून व्यावसायिक, औद्योगिक व घरगुती वापरासाठी हिचे महत्व अनन्य साधारण आहे. वीज निर्मिती, वीज पारेषण, वीज वितरण व अपांरपारिक ऊर्जा धोरणामध्ये बदलत्या परिस्थितीला अनुरुप असे धोरणात्मक बदल करणे आवश्यक झाले आहे. लोक प्रतिनिधी व वीज क्षेत्राशी संबंधित घटक (Stake Holder) यांचेकडून या संबंधाने सातत्याने तशी मागणी करण्यात येत आहे. तसेच विधान मंडळाचे मार्च, २०२० मधील अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये विधान सभेमध्ये या विषयावर चर्चा झाली आहे. वरील सर्व बाबींचा विचार करुन राज्यातील समतोल विकास होण्याच्या दृष्टीने रोजगाराभिमुख उद्योगधंद्याना प्रोत्साहन देणे, वीज निर्मिती, वीज पारेषण व वीज वितरण मध्ये होणारा अनावश्यक खर्च कमी करणे, सदरहू क्षेत्र अद्यावत करणे, शेतकऱ्यांना दिवसा सलग चार तास वीज पुरवठा उपलब्ध करुन देणे, नवीन कृषीपंप वीज जोडणी धोरण ठरविणे व सौर ऊर्जेला प्राधान्य देणे इत्यादी बाबींवर निर्णय घेण्यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. वरील विषयाच्या अनुषंगाने शासनास शिफारशी सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| (१) प्रधान सचिव (ऊर्जा) | -- | अध्यक्ष |
| (२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक (महावितरण कंपनी) | -- | सदस्य |
| (३) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक (महानिर्मिती कंपनी) | -- | सदस्य |
| (४) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक (महापारेषण कंपनी) | -- | सदस्य |
| (५) संचालक (वाणिज्य), महावितरण कंपनी | -- | सदस्य सचिव |
| (६) संचालक (संचालन), महावितरण,महानिर्मिती, व महापारेषण कंपनी | -- | निमंत्रित सदस्य |
| (७) संचालक (प्रकल्प), महावितरण,महानिर्मिती, व महापारेषण कंपनी | -- | निमंत्रित सदस्य |
| (८) संचालक (खनिकर्म), महानिर्मिती कंपनी | -- | निमंत्रित सदस्य |
| (९) संचालक (वित्त), महावितरण कंपनी | -- | निमंत्रित सदस्य |
| (१०) सह सचिव/उप सचिव (ऊर्जा), ऊर्जा विभाग | -- | निमंत्रित सदस्य |
| (११) श्री उत्तम झाल्टे, से.नि.संचालक(संचालन),महापारेषण | -- | निमंत्रित सदस्य |

(१२) श्री रमाकांत मेश्राम, से.नि.अति.व्यवस्थापकीय संचालक(BHEL) -- निमंत्रित सदस्य

(१३) श्री अनिल खापर्डे, से.नि.कार्यकारी संचालक(तांत्रिक),महावितरण -- निमंत्रित सदस्य

याशिवाय समिती आवश्यकतेनुसार योग्य त्या तज्ञ सदस्यांना निमंत्रित करु शकेल.

**२. समितीची कार्यकक्षा -**

**समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.**

(१) राज्यातील ० ते १०० युनिट वापर असणाऱ्या घरगुती ग्राहकांना मोफत वीज देणे.

(२) वीज उत्पादन खर्च कमी करण्याच्या दृष्टीने विविध उपाययोजना करणे.

(३) महावितरण, महानिर्मिती, महापारेषण या तिन्ही कंपन्यांनी नवीन तंत्रज्ञानाचा वापर करुन त्यांचा संचालन व सुव्यवस्थेचा (ओ ॲन्ड एम) खर्च कमी करणे.

(४) महावितरण कंपनीची तांत्रिक व वाणिज्यिक वीजगळती, तूट, वितरण हानी कमी करणे.

(५) कृषी ग्राहकांना दिवसा चार तास सलग वीज उपलब्ध करुन देणे.

(६) वीज ग्राहकांची वीज देयके अचुक येण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करणे.

(७) महापारेषण कंपनीचे ट्रान्समिशन चार्जेस कमी करण्याकरिता उपाययोजना आखणे.

(८) राज्यात मोठया प्रमाणात सौर ऊर्जेला प्राधान्यक्रम देण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

(९) राज्याचा समतोल विकास होण्याच्या दृष्टीने विविध भागातील उद्योगधंद्यांना सवलतीच्या दरात वीज उपलब्ध करुन देण्यासाठी सवलतीच्या दरात वीज उपलब्ध करुन देण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

(१०) राज्यातील सुतगिरण्या व यंत्रमाग उद्योगांना सवलतीच्या दरात वीज पुरवठा करणे. यासह जाचक अटी व नियम कमी करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेणे.

(११) प्रलंबित वीज जोडणी बाबतचे वीज जोडणी धोरण अंतिम करणे व त्यावर निर्णय घेणे.

३. उपरोक्त बाबींच्या अनुषंगाने समितीने सखोल अभ्यास करुन आपल्या शिफारशी तीन आठवडयात शासनास सादर कराव्यात.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००६१५१४४४५६९५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.06.15 15:31:37 +05'30'

**( प्रशांत पुं.बडगेरी )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन विभाग
८. सचिव,महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं. १, १३वा मजला,कफ परेड, मुंबई ०५.
९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१०. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
११. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१२. संचालक (वाणिज्य), महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१३. संचालक (संचालन), महावितरण/महानिर्मिती/महापारेषण कंपनी, मुंबई-५१
१४. संचालक (प्रकल्प), महावितरण/महानिर्मिती/महापारेषण कंपनी, मुंबई-५१
१५. संचालक (खनिकर्म), महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१६. संचालक (वित्त), महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१७. सहसचिव / उपसचिव, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. श्री उत्तम झाल्टे, से.नि. संचालक (संचालन), महापारेषण
१९. श्री रमाकांत मेश्राम, से.नि.अति.व्यवस्थापकीय संचालक (BHEL)
२०. श्री अनिल खापर्डे, से.नि. कार्यकारी संचालक (तांत्रिक), महावितरण
२१. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.